इत्यर्थ

वर्ष पहिले अंक अकरावा

मे २०१३

संपादक:

सृजा (औरंगाबाद)





संपर्क: ई-साहित्य प्रतिष्ठान

जी-११०२, अकरावा मजला,

ईटर्निटी, तीन हात नाका,

इस्टर्न एक्स्प्रेस हायवे,

ठाणे पश्चिम. ४००६०४.

मो. ९८६९६७४८२०

वेबसाईट : www. esahity. com, etyarth. blogspot. in

ईमेल: esahity@gmail. com, etyarth. esahity@gmail. com.



दोस्त हो ,

उन्हाळयाने अगदी वैताग आणला असेल ना? अशा वेळेस सुंदर गारवा देणारा फॅन, वाळयाचं सरबत आणि मोगऱ्याचा अलगद आलेला सुगंध किती आल्हाददायक वाटतो ना ?

असाच काहीसा गारवा तुमच्या मनाला देण्यासाठी आम्ही हा ईत्यर्थ चा “सुपर कुल” अंक आणला आहे. यातल्या कथा आणि लेख वाचून तुमचं मन कसं हिरवं गार होईल आणि थकवा कुठल्या कुठे पळून जाईल याची १००% खात्री आहे.

वेगवेगळे विषय आणि संकल्पना यांच्या संगमातूनच बनला आहे हा अंक......

तुम्हाला नक्कीच या अंकातून लिखाणाची प्रेरणा मिळेल ही अपेक्षा.

हा अंक तयार करताना जेव्हा लेख वाचत गेले तेव्हा जाणवलं प्रत्येक लेखकाचं वेगळेपण, त्याची जगाकडे बघायची नजर आणि कुवत. असे लेखन वाचायला मिळाल्याबद्दल मी भाग्यवान समजते स्वत:ला.

हरीष जोशींची भटकंती वाचताना त्यात इतके गढून जायला होते की जणू आपणच प्रत्यक्ष सर्व दृश्ये बघत आहोत असेच वाटते.

तर अविनाश कुलकर्णींच्या शेवटच्या स्टेशनानं मनाचा ठाव घेतला , एक क्षणभर काळजाचा ठोका चुकवला हे मात्र नक्की.

मंदार शिंदे यांनी अनुवादित केलेली एका पोळयाची गोष्ट जरा हलके हलके चिमटे काढून गेली पण विचार मात्र नक्की करायला लावला. एक मिनिट का होईना अंतर्मुख जरूर झाले.

तर गौरी किर्तने यांनी इंटरनेट्च्या आभासी जगातील गुंतागुत आणि भावना , मानवी मन यांचे उत्तम विश्लेषण केले आहे.

बागेश्री देशमुख यांची अनेक ट्विस्ट , टर्न घेणारी कथा माणसाला गुंगवून ठेवते खरे......!!

असे म्हणतात की कोणत्याही गोष्टीचा शेवट गोड व्हावा, म्हणूनच प्रभावी व्यक्तिमत्त्व हा लेख......एका प्रभावी व्यक्तिमत्वाची जडणघडण कशी होते ते जाणून घेऊया श्री. तुषार नातू यांच्याकडून. किंवा लागत

ते स्वत: व्यसनमुक्तीसाठी समुपदेशक म्हणून काम करतातच आणि शिवाय ते लेखक ही आहेत. लवकरच त्याच्या “ मला समजलेला देव ..अल्लाह ..वगैरे !” या लेख मालेचे पुस्तक प्रसिध्द होत आहे. त्यांना अनेकानेक शुभेच्छा.....!!!.

- टीम ईसाहित्य



# अनुक्रम

# भटकंती

१२मार्चला राजधानीने संध्याकाळी मुंबई सेन्ट्रलहून नवी दिल्लीला रवाना झालो.पश्चिम expressने थेट अमृतसरला न जाता राजधानीने दिल्लीला जाऊन तिथून पश्चिम पकडायची व ६-७तासांचा प्रवास वाचवायचा असा चतुर प्लॅन आखला होता. राजधानी वेगवान असल्याने ५तास आधी सुटणाऱ्या पश्चिमला मागे टाकत सकाळी साडे आठला नवी दिल्लीला पोचते. पश्चिम सकाळी साडे अकराला तिथे येते. पण सुरतनंतर कुठेतरी आधीच्या एका गाडीची derailment झाल्याने राजधानी चार तास रखडली. आपल्याकडच्या total communication lapseमुळे पश्चिम पुढे गेली की काय या शंकेने आम्ही व्याकूळ झालो कारण आमचे दिल्ली-अमृतसर द्वितीय वातानुकूलश्रेणीचे आरक्षण त्या गाडीचे होते. दिल्लीला जाईपर्यंत कुठलीही अधिकृत माहिती मिळाली नाही. समजा पश्चिम पुढे काढली तर सगळाच गोंधळ! पुढचा ७-८तासांचा प्रवास कसा करायचा? मला पुढचा सगळा गैरसोयींचा डोंगर दिसू लागला. आता माघार घेणे शक्यच नव्हते. त्यामुळे दिल्ली येईपर्यंत जीवात जीव नव्हता. सुदैवाने पश्चिमही ५तास लेट झाली व सकाळी साडे अकराऐवजी साडेचारला दिल्लीहून सुटली व आम्हीही सुटलो. रात्री बारा वाजता अमृतसरला पोचलो. आमच्या

गाडीवाल्याशी सतत संपर्क ठेवल्याने तो tempo traveler गाडी घेऊन स्टेशनवर हजर होता. तो आम्हाला आमच्या हॉटेलवर घेऊन गेला.त्यामुळे स्थलदर्शनाचा कार्यक्रम दुसऱ्या दिवशी  योजल्या प्रमाणे विनाबदल सुरू झाला.

अमृतसरला सुवर्ण मंदिरात अफाट गर्दी होती पण कुठेही बेशिस्त नव्हती. वेळेअभावी आम्ही मंदिरात गेलो नाही. पण पूर्ण प्रदक्षिणा केली. जोडे ठेवण्याची सोय महिला सांभाळत होत्या. एवढ्या गर्दीत त्या ज्या निष्ठेने व सेवाभावाने श्रमत होत्या त्याला तोड नाही. प्रसाद म्हणून द्रोणभर निथळणारया तुपातला चविष्ट शिरा देत होते. बाहेरच्या बाजूला एके ठिकाणी भिंद्रनवालेचे पोस्टर टांगलेले दिसले. तिथून बाहेर पडून सुवर्णमंदिराची प्रतिकृती भासणाऱ्या व मंदिराभोवती तसाच पण लहान पाण्याने भरलेला तलाव असलेल्या दुर्गियानामंदिरात गेलो.

तिथे विशेष कांही नव्हते. जवळच जालियनवाला बाग आहे. तिथे बऱ्याच जुन्या खुणांचे जतन केले आहे. निरपराध स्त्री, पुरूष व बालकांचे निर्घृण हत्याकांड करणाऱ्या जनरल डायर या नराधमाला कधीही  पश्चात्ताप झाला नाही. इतक्या गंभीर घटनेचे स्मारकही त्याच गांभीर्याचा प्रत्यय देणारे वाटले नाही. तिथे केलेल्या भल्यामोठ्या

हिरवळीच्या उद्यानाचे जनतेने picnic spot केले आहे. अर्थात हे माझे वैयक्तिक मत आहे.

दुपारी तीन वाजता वाघा सीमेकडे कूच केले. तिथे भर उन्हात बरीच वणवण करावी लागली. बसण्याची शिस्तशीर व्यवस्था नव्हती. आपल्या बाजूने अफाट गर्दी होती. कर्कश आवाजात तथाकथीत देशभक्तीपर गाणी प्रचंड मोठ्या आवाजात लावली होती. दूर अंतरामुळे प्रत्यक्ष कार्यक्रम नीट दिसत नव्हता. प्रचंड गोंगाट करून जनता आपल्या देशभक्तीचे बेशिस्त प्रदर्शन करीत होती. स्री पुरूषांसाठी प्रसाधनाची कुठलीही व्यवस्था नव्हती. कांही स्वयंघोषित क्रांतीकारक भलेमोठे ध्वज फडकवत मागच्या प्रेक्षकांना जे कांही थोडेफार दिसत होते तेही झाकून टाकण्याची जबाबदारी चोख पार पाडत होते. दोन्ही देशांचे ध्वज सूर्यास्ताला आदरपूर्वक उतरवण्याचा दैनिक कार्यक्रम दोन्हीकडचे जवान आवश्यक त्या इतमामाने पूर्ण करीत असतांना आपल्याकडची जनता मात्र एखाद्या सिनेमाचा ट्रेलर पहात असल्यासारखी वागत होती. यात भर म्हणून की काय दोन सिनेमा नटीसारख्या दिसणारया BSFच्या महिला सैनिक

अतिशय स्टायलिशपणे फिरत होत्या. त्या सैनिकापेक्षा air hostess म्हणून जास्त शोभल्या असत्या. BSFचा पण सैनिकी वेशात नसलेला एक इसम लोकांच्या भावना भडकवण्याचं काम करून उन्माद वाढवत होता. एकंदरीत सर्वांनी मिळून सवंगतेची नवीच पातळी गाठल्यासारखे मला वाटले. अर्थात सगळ्यांना असे वाटले नसणार. एखादा सिनेमा पाहून बाहेर पडणाऱ्या आनंदी जमावासारखी मंडळी खिदळत दोन तीन तास तुंबलेले मुत्रविसर्जन जमेल तिथे करीत त्या विराट नाट्याला शक्य तेवढे गालबोट लावीत परत फिरली.

वाघा सीमेवर लांबलचक पॅसेजच्या भारताच्या बाजूच्या कमानीवर बापूंचा एक जुनाट फोटो मध्यभागी लावला आहे व पाकिस्तानच्या कमानीवर महमदअली जीनांचा. दोन्हीकडच्या कमानी अगदी सारख्या. आपल्याकडच्या पॅसेजच्या दोन्ही कडांनी लोखंडी गज लावले आहेत. त्यावर बोगनवेलीसदृश झुडपे सोडली आहेत.पॅसेज इतका मोठा आहे की आपल्या बाजूने पाकिस्तानच्या बाजूचे कांही दिसत नाही, ज्याची

आपल्याला जास्त उत्सुकता असते. आपल्या कमानीवर व त्यांच्या कमानीवर गणवेषधारी जवान शस्त्रसज्ज असतात. आपल्या कमानीखालून आत शिरल्यावर डाव्या बाजूला स्टेडियममध्ये असते तशी पायऱ्या पायऱ्यांची सिमेंटची बसण्याची व्यवस्था आहे. तिथून कार्यक्रम बघण्यासाठी सतत मान डावीकडे वळवून ठेवावी लागते. मानेला रग लागते व उन्हाने पार्श्वभाग छान शेकून निघतो. डोक्यावर छपराची व्यवस्था नसल्याने टोपी न आणणाऱ्यांची टाळकी गरम होतात. सैनिकांचे जीवन किती खडतर असते याची लहानशी झलक प्रेक्षकांना अनुभवायला मिळावी या उदात्त हेतूने अनेक गैरसोयी ठेवण्यात आल्या असाव्यात.

उजवीकडच्या बाजूने आसन व्यवस्था नाही. अरूंद कडेच्या तळाला प्रेक्षकांना खाली बसवतात.इकडून सतत उजवीकडे मान वळवावी लागते. मधल्या पॅसेजमध्ये देशभक्तीची मदिरा प्राशन करून धुंद झालेल्या नाचणाऱ्या व गाणाऱ्या मोठमोठ्या गटांच्या पायांखाली आपले पाय चिरडले जाणार नाहीत याची अखंड सावधानता बाळगावी लागते. VIP म्हणून आत येणाऱ्यांसाठी खास व सोयीची व्यवस्था

पाकिस्तानकडील गेटजवळ असते त्यामुळे त्यांना सर्व कार्यक्रम नीट बघता येतो. सामान्य माणसाची सगळीकडेच गोची!

या व्यवस्थेत(की अव्यवस्थेत?) काय सुधारणा करणे शक्य आहे याचा मी माझ्या अल्प मतीने कांही आढावा घेतला ।

१) सामान्य प्रेक्षकांना उन्हातून मैलभर चालायला लागूनये म्हणून सतत फेऱ्या करणाऱ्या मिनी बसेसची सोय करणे

२)सिमेंटच्या पायऱ्यांवर शेड करणे

३)सर्वांना नीट दिसावे यासाठी मोठे TV Screen लावणे

४) पॅसेजच्या गजांवर महावीरचक्र विजेत्या वीरांचे मोठे cutouts लावणे

५)या सगळ्यावाढीव खर्चासाठी प्रेक्षकांना तिकीट लावणे

६) पिण्याच्या पाण्याची व स्वच्छ प्रसाधनगृहांची  येणारया प्रेक्षकांची मोठी संख्या लक्षात घेऊन भरपूर व्यवस्था करणे

अमृतसरला शीख नसलेल्यांची संख्या लक्षणीय होती.शहराचा कांही भाग सोडता अस्वच्छ गल्लीबोळ, अरूंद रस्ते भरपूर होते. संध्याकाळी पाऊस पडल्याने कमालीची थंडी होती. हीच थंडी डलहौसीलाही आमच्याबरोबर आली. त्याचा अनुषंगीक फायदा असा झाला की सगळी पर्वत शिखरे शुभ्र धवल हिमवर्षावाने झळाळून निघाली. आपण आपल्याला परिचित नसलेल्या भासमय सृष्टीत आल्यासारखे झाले. अगदी जवळून भरपूर बर्फात वय विसरून धांगडधिंगा करता आला. आमच्यातल्या एकाने एवढ्या वाया जाणाऱ्या बर्फाविषयी हळहळ व्यक्त करीत हा बर्फ मुंबईत बर्फाचे गोळे विकणाऱ्यांना विकता येईल कां याची चाचपणी सुरू केली. यामुळे त्याला अनेक थपडा व अपशब्दांचा आहेर मिळाला.

- हरीश जोशी (harishjoshi1945@gmail.com)

# शेवटचं स्टेशन

रेल्वे गाडीत खचाखच गर्दी होती...... जीव गुदमरला होता.. साधारण सायंकाळची वेळ असेल. हवा कुंद होती.व उष्मा ही होता.. डबा खचाखच भरल्याने डब्यातले वातावरण कोंदट असे झाले होते.. खरं म्हणजे मला ह्या प्रवासाला यायचे नव्हते.. एक तर वय पण झालं होत.. त्यातुन नुकतीच बायपास झाली होती... वर मधुमेह व रक्तदाब हे आमचे मित्र आम्हाला सोडत नव्हते... एकदाची गाडी सुटली... १-२ स्टेशन वर थांबली.. काही आत आले, काही बाहेर गेले...एका मुलानं बसायला जागा दिली... आरामात बसलो,गाडीनं वेग घेतला. गाडी लयीत धावत होती.. खिडकीतुन गार वारा येत होता...कधी डोळा लागला कळाले नाही.

स्वप्न कि काय कळेना..एक घर दिसलं, माझंच होतं.. बरेच लोक जमले होते, मित्र होते, नातेवाईक होते. आत गेलो तर, ही कोपऱ्यात रडत बसलेली दिसली,बायकांच्या घोळक्यात.

काय प्रकार कळेना, जमीनीवर कुणीतरी झोपले होते.. नाका कानांत कापसाचे बोळे, अंग पांढ~या कपड्यानं झाकलेलं... त्यावर हार, गुलाल. जवळ जाऊन पाहिलं अन, हबकलोच... तो मीच होतो.. खाडकन जागा झालो.. पाहिलं तर गाडी थांबलेली होती...

डबा मोकळा होता.. खाली उतरलो, अंग हलकं, डोकं जड झालं होतं.. बाहेर अंधार होता.. प्लॅटफोर्मवर शुक शुकाट होता.. कुठे आलो कळत नव्हते. कुठलं स्टेशन आलं समजत नव्हतं.. समोर स्टेशन मास्तर उभा होता.. त्याचा चेहेरा पण नीट दिसत नव्हता..

मास्तर कुठलं स्टेशन आलं?.. विचारलं अन डोळ्यासमोर अंधारी आली.. बाजुच्या बाकावर बसलो.. काहीच उमजत नव्हतं. "काका शेवटच स्टेशन आहे, गाडी पुढे जाणार नाही..प्रवास संपला.. बस एवढच ऐकु आलं..........

- अविनाश कुलकर्णी (chakkachur@gmail.com)

# एका पोळ्याची गोष्ट

*(चेतन भगत यांच्या १९ एप्रिल २०१३च्या 'टाइम्स ऑफ इंडीया'मधील लेखाचा मी केलेला मराठी अनुवाद)*

फार वर्षांपूर्वी, एका मोठ्ठ्या जुन्या झाडावर एक प्रचंड मोठं मधमाश्यांचं पोळं होतं. आजूबाजूला रंगीबेरंगी टवटवीत फुलांनी बहरलेले बाग-बगिचेही होते.

त्या पोळ्याचा कारभार चालवण्यासाठी काही ज्येष्ठ मधमाश्यांसोबत एका राणी माशीची नेमणूक करण्यात आली होती. त्या सगळ्यांना 'सरकारी माश्या' असं म्हटलं जाई. 'कष्टकरी माश्या' त्यांचं मध सुरक्षितपणे साठवून ठेवण्याचं काम या 'सरकारी माश्यां'वर सोपवून निर्धास्त होत्या. याबाबतीत कष्टकरी माश्यांचा सरकारी माश्यांवर

पूर्ण विश्वास होता. शिवाय, नवीन बगिच्यांचा शोध घेणं, पुढच्या पिढीतील तरुण माश्यांसाठी मधाचे नवनविन स्रोत शोधून काढणं, अशी कामंदेखील सरकारी माश्यांकडून अपेक्षित होती.

पोळ्याचा कारभार कुठलाही गडबड-घोटाळा न होता सुरळीतपणे चालावा, यासाठी सरकारी माश्यांनी काही नियम बनवले होते आणि कायदेही संमत करून घेतले होते. कष्टकरी माश्यांना त्यांचं पालन करावंच लागे, अन्यथा त्या शिक्षेस पात्र ठरत. पोळ्यात राहणाऱ्या विविध जातीच्या मधमाश्या आपापसात भांडून पोळ्यासाठी समस्या निर्माण होऊ नयेत, यासाठी अशा नियम व कायद्यांची गरज होती. उदाहरणार्थ, काळ्या माश्या आणि लाल माश्या असे दोन मुख्य प्रकार होते. त्यांचं काम एकाच प्रकारचं होतं. फक्त, त्या दिसायला थोड्या वेगळ्या होत्या आणि त्यांच्या प्रार्थनेच्या आपापल्या वेगळ्या पद्धती होत्या.

अशा या परिपूर्ण पोळ्यामधे सर्व काही आलबेल होतं. पण काळानुसार काही बदल घडत गेले. सरकारी माश्यांची स्वतःची मुलं, नातेवाईक, आणि मित्रमंडळी होती.

त्यापैकी बहुतेकांना 'सरकारी माश्या' बनता आलं नाही. त्यांना इतरांसारखं 'कष्टकरी माश्या' बनूनच जगावं लागलं. पण एके दिवशी, एका ज्येष्ठ सरकारी माशीच्या मुलानं आपल्या जन्मदात्याकडं तक्रार केली की, कष्टकरी माशी म्हणून जगणं फारच कष्टाचं काम आहे. "आपल्या सरकारी मधाच्या साठ्यांमधून मी थोडंसं मध घ्यायला काय हरकत आहे?" त्यानं विचारलं. "नाही, हे अयोग्य आणि अनैतिक आहे," सरकारी माशीनं म्हटलं.

"कुणाला काऽही कळणार नाही. सरकारी गोष्ट आहे, सरकारपुरतीच राहील," सरकारी माशीच्या मुलानं उपाय काढला. बरोबरच होतं त्याचं. कष्टकरी माश्यांचा स्वतःपेक्षा जास्त सरकारी माश्यांवर विश्वास होता. थोडंसं मध गायब झालं तर कुणाच्या लक्षातही येणार नव्हतं.

आणि मग झाली की सुरुवात. हळूहळू, सगळ्या सरकारी माश्यांच्या मुलांनी, भावंडांनी, नातलगांनी, मित्रांनी, आणि हितचिंतकांनी रोज सरकारी साठ्यातलं थोडं-थोडं मध चोरायला सुरुवात केली. आता त्यांना दिवसभर बाग-बगिच्यात मजुरी करायची गरज

नव्हती. अपेक्षेनुसार मधाची पातळी वाढत नाहीये, हे कष्टकरी माश्यांच्या लक्षात येऊ लागलं. काही कष्टकरी माश्यांनी हा मुद्दा उचलताच सरकारी माश्यांनी फर्मान सोडलं, "आळस झटका आणि कामाला लागा".

मधाचा साठा वाढवण्यासाठी कष्टकरी माश्या अजून कष्ट करू लागल्या. तरीसुद्धा, मधाची पातळी काही वाढेचना. उलट, दिवसेंदिवस मध कमीच होऊ लागला.

लवकरच, सरकारी माश्यांनी आणखी एक धोरण आखलं. एखाद्या नव्या बागेचा शोध लागला की सर्वप्रथम त्यांच्या मुलांना, नातेवाईकांना, आणि मित्रांना तिचा लाभ दिला जाऊ लागला. "जे कष्टकरी माश्यांना ठाऊकच नाही, ते त्यांच्याकडून हिरावून कसं घेणार," अशी कुजबूज सरकारी वर्तुळात सुरू झाली.

पुढेपुढे, मधाची पातळी तर घटत गेलीच, शिवाय कष्टकरी माश्यांच्या मुलांसाठी नव्या बागाही सापडेनाशा झाल्या. आता ते रिकामटेकडे आणि उपाशी राहू लागले. कधीकधी,

राणी माशी या कष्टकरी माश्यांपुढं थोडं मध शिंपडे, आणि मग सगळीकडं राणीची वाहवा होई. तरीसुद्धा, हे शिंपडलेलं मध पुरेसं नव्हतंच.

"कोण चोरतंय आपलं मध?" शेवटी एके दिवशी, एका प्रभावशाली कष्टकरी माशीनं प्रश्न विचारलाच. ही प्रभावशाली बंडखोर माशी काळ्या माश्यांच्या गटातली असल्याचं सरकारी माश्यांच्या लक्षात आलं. म्हणून, सरकारी माश्या म्हणाल्या, "लाल माश्या चोरताहेत तुमचं मध." त्यानंतर, सरकारी माश्यांनी लाल माश्यांना बोलावून घेतलं, आणि त्यांना सांगितलं, "काळ्या माश्या तुमच्या कष्टाच्या कमाईवर डल्ला मारतायत असं आम्हाला वाटतंय."

उपासमार आणि कष्टानं वैतागलेल्या काळ्या आणि लाल माश्यांना संताप अनावर झाला. त्यांची एकमेकांशी तुफान भांडणं झाली. आपल्यावरची पीडा टळल्यानं या भांडणांची मजा लुटत सरकारी माश्यांनी मधचोरी सुरूच ठेवली. जसजशा लाल आणि काळ्या माश्या मरू लागल्या आणि जखमी होऊ लागल्या, तसतशा सरकारी माश्या

अजून थोडं-थोडं मध शिंपडत राहिल्या. कष्टकरी माश्यांनी पुन्हा राणी माशीचा जयजयकार केला.

थोड्याच दिवसांत, त्या भागात दुष्काळ पडला. फुलांची संख्या कमीकमी होत गेली, आणि इतकी वर्षं साठवलेल्या मधाचा उपयोग करण्याची वेळ आली. पण, सर्वांसाठी धक्कादायक गोष्ट म्हणजे, सरकारी साठ्यांमध्ये मधाचा थेंबही शिल्लक नव्हता. पूर्णपणे सरकारी माश्यांवर विश्वास ठेवून राहिलेल्या कष्टकरी माश्या सरकारी माश्या आणि त्यांच्या संबंधितांच्या घराकडं वळल्या. ते सर्वजण गलेलठ्ठ होऊन आपापल्या 'खाजगी' मधाच्या साठ्यांवर आरामात बसलेले दिसले. हे कमी म्हणून की काय, त्यांना शेकडो नव्या बाग-बगिच्यांचे नकाशेदेखील सापडले, ज्यांचा कष्टकरी माश्यांना थांगपत्ता लागू दिला नव्हता.

या सर्व प्रकारानं अचंबित झालेल्या कष्टकरी माश्या हा धक्का पचवत आपापल्या घरी परतल्या. लाल आणि काळ्या माश्यांची नजरानजर झाली. आपल्याला मूर्ख

बनवण्यात आलं, हे दोघांच्याही लक्षात आलं. त्यांनी एकमेकांच्या गळ्यात पडून, एकमेकांना इजा पोहोचवल्याबद्दल माफी मागितली.

"आपण त्यांना चांगला धडा शिकवू," काळ्या आणि लाल माश्या एकमुखानं म्हणाल्या. कष्टकरी माश्यांना कळून चुकलं की, आपल्या नांग्या एकमेकांविरुद्ध नव्हे तर आपल्याला फसवणाऱ्यांविरुद्ध वापरण्याची वेळ आलेली आहे.

दरम्यान, राणी माशीला तणावपूर्ण परिस्थितीचा अंदाज आला. तिनं आपल्या सुंदर तरुण मुलाला समोर आणलं, "हाच आता तुम्हाला वाचवेल. जसं इतकी वर्षं मी वाचवलं."

पण, लाल आणि काळ्या माश्या यावेळी सावध होत्या. त्या सगळ्या एकत्र आल्या आणि सरकारी माश्या व त्यांच्या बगलबच्च्यांवर त्यांनी आपल्या नांग्या उगारल्या. सरकारी माश्यांना आपली संपत्ती गोळा करायलासुद्धा वेळ मिळाला नाही. सगळं

जागेवर टाकून त्यांना पोळं सोडून पळून जावं लागलं. लवकरच, त्यांच्यापैकी कुणीही त्या पोळ्यात उरलं नाही.

लाल आणि काळ्या माश्यांनी आपल्यापैकी सर्वोत्तम लोकांच्या हाती सत्ता द्यायचं ठरवलं. तसंच, यापुढं कोणावरही आंधळा विश्वास टाकायचा नाही, सर्वांवर लक्ष ठेवायचं, असंही ठरवलं. हळूहळू पोळ्याची स्थिती सुधारत गेली, आणि मधाचा साठा पूर्ववत भरण्यासाठी नवी पिढी अजून कष्ट उपसू लागली. नव्या बाग-बगिच्यांनी नवी संपन्नता आणली, आणि ते पोळं जगातलं सर्वात यशस्वी पोळं समजलं जाऊ लागलं.

काही वर्षांनंतर, एका रात्री एक वृद्ध माशी आपल्या नातवाशी बोलताना म्हणाली, "तुला माहित्येय का, एके काळी आमच्यावर एका राणी माशीचं राज्य होतं?" "हो. पण आमच्यावर नाही. कारण आम्हाला माहित्येय की, एक छोऽटासा राजा आमच्यापैकी प्रत्येकाच्या आत लपलेला आहे," छोट्या माशीनं उत्तर दिलं.

- मंदार शिंदे (shindemandar@yahoo.com)

# तो........

तो तिला रोज फ़ोन करायचा.... तीही बोलायची त्याच्याशी रोज... भेटणे झाले कि एकमेकांना चोरून बघायचे.... बरेच दिवस लपाछुपीचा खेळ सुरु होता... बघता बघता कधी दोघे प्रेमात पडले समजलेच नाहि...रोज बोलणं सुरु झालं आणि मग :

तो : तू का ग इतका उशीर करतेस ऑन लाईन यायला ? मी चातकासारखी वाट पाहत असतो तुझी

ती : अरे घरात खूप काम होतं. उद्या नक्की वेळेवर येईन. दिवसामागून दिवस गेले. रोज बोलणे, अगदी रात्री उशिरापर्यंत ऑन लाईन नाही तर मेसेज करून. पण बोलणं मात्र थांबत नव्हतं. अगदी “जेवलीस का?”, “काय करतेस?” इथपासून सुरवात एक मिनिट चैन पडत नसे दोघांना. फोन मेसेज नाही आला कि

कावरे बावरे होऊन जायचे दोघे. दोघांनी आयुष्य एकत्र घालवायच्या आणाभाका घेतल्या.

ती : तू हल्ली फोन का करत नाहीस ?

तो : कामाच्या व्यापात वेळच मिळत नाही ग…

ती : इतका बिझी झालायस?

तो : हो ग काय सांगू कंटाळा आलाय …

ती : खूप काम असत का रे तुला. थकत असशील ठीक आहे तुला जेव्हा वेळ मिळेल तेव्हा आपण बोलत जाऊ

तो : हम्म

काही दिवस हे असच संभाषण होत होतं. ती संयमाने घेत होती. वेडी आशा बाळगून होती. वेळ सरत गेली लोकांच्या नजरेत त्यांचं प्रेम खुपू लागलं कदाचित. त्याच्या बोलण्यात तिला बदल जाणवू लागला. तो टाळत होता तिला, पण तिचा विश्वास होता.

तस काही नसेल ती अंधारात होती त्याच्या मनात शंकेची पाल चुकचुकत होती आणि ….

ती : नेहेमी मीच फोन करायचा का रे ? तू हल्ली स्वतः फोन करत नाहीस. ऑन लाईन पण बोलत नाहीस, मेसेज नाही. काही अडचणीत आहेस का ?

तो : माझ्या अडचणी मला माहित. तुला काय करायचय? मी कोणाला सांगत नाही. तू ह्या पासून लांब राहा.

ती : बरं बरं! ठीक आहे. चिडू नको. डोकं शांत झालं कि आपण बोलू. जेवलास तू ?

तो : तुला माझी काळजी करायची गरज नाही

ती : (लाडाने) मी नाही करणार तर अजून कोण करणार तुझी काळजी ?

तो : मी फोन ठेवतो. थकलोय .खूप उशीर पण झालाय. झोप येतेय मला .

ती : बरं. आराम कर. लव यु .

तो : हम्म. बाय.

आणि एक दिवस ते दोघे भेटले. ती अखंड बडबड करीत होती. तो फक्त “हो” “नाही” ह्यापलीकडे काहीच बोलत नव्हता.

ती : का रे? बोल नं

तो : ह्म्म

ती : पण तू रडतोयस का ?

तो : काही नाही

ती : सांग न.

तो : काही नाही.

ती : ह्म्म...

तो : प्रिये, तुला काही सांगावंसं वाटतंय गं...

ती : बोल नं. हेच सांगायचं आहे ना, “तुझं माझ्यावर किती प्रेम आहे”. मला माहित आहे ते.

तो : प्रेम तर आहेच गं. अगदी जीवापाड. पण जगाला मान्य नाही ग. (रडत होता आक्रंदत होता). तुझ्या वाचून राहू नाही शकत ग मी

ती : माहित आहे मला. मीही नाही राहू शकत तुझ्याशिवाय. जगाचा आपण का विचार करायचा? ते तर बोलणारच.

तो : हृम्म

ती : सांग न

तो : काही नाही. मी जातो. काम आहे मला. भेटू पुन्हा कधी तरी.

ती : का रे? बोल नं...

तो : बाय.

ती : बोल नं. थांब ना थोडा वेळ.

तो : बाय.

त्याच्या वागण्याचा काहीच अंदाज तिला येत नव्हता. कदाचित कळत होतं पण वळत नव्हतं. ती तर स्वत:च्या स्वप्ननगरीत अशी काही रमली होती कि डोळ्यावर झापडं बांधून फिरत होती. तिला काहीच लक्षात येत नव्हतं. तो तिला सपशेल टाळू लागला होता. ती वेड्या सारखी त्याच्या फोन ची वाट बघायची. ह्याच भ्रमात कि तो कामात असेल, वेळ मिळत नसेल, व्यापात जमत नसेल. पण तो भ्रमाचा भोपळा लवकरच फुटणार होता. जे चाललं होतं ती वादळापूर्वीची शांतता होती.

आणि एके दिवशी ते घोंघावणारं वादळ आलंच तिच्या आयुष्यात. तो तिला भेटायला आला. ती एकदम खुश झाली जणू आनंद गगनात मावेनासा झाला आणि पाय जमिनीला टेकेनासे झाले. तिच्या प्रश्नाची सरबत्ती सुरु होती. एकामागे एक .... अगदी एका दमात ती विचारात होती आणि तो एकदम शांत काहीच उत्तर देत नव्हता तिला

ती : हाय

तो : हम्म

ती : ए! तू कसा आहेस? कुठे होतास ? तब्येत बरी आहे ना? बाहेर गेला होतास का?

घरी सगळं ठीक आहे नं?

ती : अरे बोल ना. इतका शांत का आहेत? कसा आहेस ?

तो : मी ठीक आहे

ती : मी रागावले आहे तुझ्यावर … बोलणार नाहीये तुझ्याशी.

तो : बरं!

ती : चालणार आहे तुला?

तो : मी काय बोलू?

ती : (लडिवाळ पणे) असा का बोलतोयस रे? तुला आनंद नाही झाला का रे माझा आवाज ऐकून मला बघून?

तो : असं काही नाही.

ती : माहित आहे मला. दिसतायत तुझे डोळे पाणावले आहेत. इतके दिवस बोललो नाही आपण. माझी आठवण येत असेल नं तुला ?

तो : नाही

ती : मस्करी करू नको

तो : हम्म ... तुझं झालं असेल तर मी काही बोलू का ?

ती : बोल नं. आय लव यु म्हणणार आहेस नं?

तो : (त्याच्या संयमाचा बंध तुटला आणि ओरडला तिच्या अंगावर) फालतू बडबड बंद कर. त्रास देऊ नको मला

ती : (एकदम अचंबित झाली आणि ) काय झालं ? असं काय बोलतोयस? चिडलायस का इतका माझ्यावर ?

तो : बोलू का मी ?

ती : (रडत) बोल. ऐकतेय मी.

तो : जे असेल ते स्पष्ट बोलेन म्हणतोय. ऐकायची तयारी ठेव.

ती : काय?

तो : मी तुझ्याशी लग्न करू शकत नाही.

ती : काय? काय बोलतोयस तू (कोसळली होती ती थरथरत होती)

तो : मी माझ्या निर्णयावर ठाम आहे

ती : एकदम काय झालं तुला (आवंढा गिळत हुंदके देत कशी बशी बोलत होती ती)

तो : मला पटत नाहीये. नाही करू शकत मी तुझ्या बरोबर संसार.

ती : पण का ? तू जगाचा विचार करतोयस का ? जगाला काय ते घाबरायचं आपण? प्रेम केलय. त्यांना काय जातंय बोलायला ? दोघे दूर जाऊ. सुखाने संसार करू.

तो : नाही ! ते शक्य नाही.

ती : का?

तो : तुझा भूतकाळ .............

ती : (गप्प आणि स्तब्ध)

अचानक अभाळ फाटून कोसळावं तशी तिची अवस्था. काय बोलावं? तिला काही सुचत नव्हतं. मेल्याहून मेल्यासारखी अवस्था झाली होती तीची. कारण त्याला तिचा भूतकाळ प्रेमात पडायच्या आधी माहित होता. तरी तो ते कारण देऊन तिला नाकारत होता.

तो : मला माफ कर. मी हे कधीच विसरू शकणार नाही कि माझ्याआधी तुझ्या

आयुष्यात दुसरे कोणी होते. आणि तू प्रामाणिक आहेस, पवित्र आहेस ह्यावर मी कसा विश्वास ठेऊ? माझ्या पचनी पडत नाहीये. जड जातंय ते. मला अशी मुलगी नकोय जिच्या भूतकाळात कोणी होतं.

ती : (निः शब्द )

तो : तुला फसवायचं नव्हतं गं. तुला बघितलं आणि तुझ्यात गुंतत गेलो. भानावर आलो तेव्हा उशीर झाला होता. मरेपर्यंत विसारणार नाही तुला तुझ्या प्रेमला पण लग्न नाही करू शकत ग मी. माफ कर मला.

ती : तुला माहीत होतं सगळं मग असा का वागलास का दिलास भरभरून प्रेम ? का सोडून जातोयस मला एकटीला ?

तो : माझा नाईलाज आहे. मला समाजात राहायचं आहे. लोकं बोलतील.......

ती : लोकांचा विचार प्रेम करताना का नाही केलास ?

तो : तेव्हा तू मनात भरली होतीस गमवायच नव्हत तुला.

ती : खेळलास तू माझ्याशी माझ्या भावनांशी...

तो : मला माफ कर

ती : एकदा पुन्हा विचार कर (जीवाच्या आकांताने त्याला विनवण्या करीत होती पण तो काहीच ऐकायला तयार नव्हता)

तो : ते शक्य नाही. पुन्हा काही भेटू नको मला फोन करू नको मी निघून जातोय तुझ्या आयुष्यातून. तू हि जा दूर पुन्हा कधी माझ्यासमोर येऊ नको मला तुझं तोंडही बघायचं नाहीये. विसरून जा मला. (त्याने तिथून काढता पाय घेतला)

आणि भुईला भेग पडावी तसे तिचे तिच्या हृदयाला ते शब्द चिरून गेले. ती स्तब्ध, निःशब्द गळून पडलेली तिथेच उभी राहून त्याला जाताना पाहत होती. ह्या आशेने एकदा तरी मागे वळून पाहिल. पण तसे झाले नाही. सूर्याच्या प्रकाशात चांदणे विलीन होते तसा तो नाहीसा झाला होता आणि ती मात्र अजूनही आस धरून उभी होती त्याला जाताना पाहत होती ...............

-गौरी कीर्तने (kirtane.gauri@gmail.com )





# गुंतागुंत

भाग १ व २

भरधाव धावणाऱ्या गाड्यांमुळे अंगावर उडणारे चिखलाचे पाणी चुकवत, पावसाच्या दिमाखदार तडाख्यापासून स्वतःला कसंबसं वाचवत, एका हाताने छत्री तर दुसऱ्या खांद्यावरची पर्स सांभाळत पदर गच्च लपेटून शेवटी तिने रस्ता ओलांडला...

ह्या साऱ्या कसरतीत तिची प्रसन्न अबोली रंगाची साडी मात्र पार गुडघ्यापर्यंत भिजली.. त्या लाडक्या साडीवर अवतरलेली चिखलाच्या थेबांची नक्षी निरखत ती बस स्टॉप वर पोहोचली...

तुरळक माणसं वगळता आज स्टॉप तसा रिकामाच. त्या पत्र्याच्या छपराखाली ती जरा विसावली, इथं उभं राहून फार पावसाचा मारा चुकत नसला तरी थेट डोक्यावर जलधारा येत नव्हत्या...

समोरचं, डावी उजवीकडचं काहीही दिसू नये, असा पावसाचा पांढुरका पट्टा सर्वत्र व्यापून उरला.. तिनं अलगदच पर्स उघडून रुमाल काढला आणि सावळ्याश्या तुकतुकीत चेहऱ्यावरचे, काळ्या- कुरळ्या कुंतलावरचे थेंब टिपून घेतले.

हातावरचं घड्याळ 'अजूनही साडे-पाच वाजलेलेच कसं दाखवतं आहे, साडेपाचला तर मी ऑफिस सोडलं' असं काहीसं पुटपुटत तिनं डावं मनगट, डाव्या कानाशी नेलं तेव्हा पाणी जाऊन घड्याळ थांबल्याचं तिला जाणवलं ..

'अरे देवा, आता वेळेची गणितं चुकणार सगळी' म्हणत कुणाला वेळ तरी विचारावी ह्या उद्देशानं तिनं वर पाहिलं तर काही वखवखलेल्या नजरा तिच्यावर टिकून असलेल्या… ताबडतोब चेहरा वळवून तिनं नजर उगाच कुठेतरी गुंतवली, बसची वाट पाहण्याशिवाय गत्यंतरच नव्हते आता.

डावीकडून आलेले लाईटचे झोत आणि कचकचून वाजलेल्या ब्रेकनिशी एक बेस्ट ची बस येऊन उभी राहिली, कंडक्टर कनवाळू असावा, ह्या पावसात बस वरची पाटी

दिसायची नाही स्टॉपवरील लोकांना असं काहीसं वाटून 'चर्चगेट, चर्चगेट' असा घोगरा आवाज पावसाच्या घनघोर आवाजाला चिरत विरला.

.. 'ही देखील आपली बस नाही' म्हणत, पुढे टाकलेलं पाऊल मागे घेत, ती होती त्या जागी स्थिरावली आणि वखवखलेल्या नजरांना मात्र नाईलाजानं प्रस्थान करावं लागलं...!

तिनं सुटकेचा नि:श्वास टाकला, पण आता बसस्टॉप पूर्वीपेक्षाही भयाण भासू लागला, सांजेने आपली वळकटी कधीच काळ्या ढगांमागे गुंडाळून ठेवल्याने अंधार दाटणं स्वाभाविक होतं!

छपरावरच्या पागोळ्यातून गळून खाली लयीत आपटणाऱ्या संततधारेकडे पहात तिची नजर शून्यात गेली...

'हे असं एकटं, इथं उभं राहण्याची, फिरण्याची सवय नाहीये का?

नोकरी करत असल्यापासून एकटीनं येणं-जाणं, मुंबईचा बेभान पावसाळा सारं काही सवयीचं आहे, मग आज वेगळं का वाटावं सगळं! मघाच्या त्या नजरा तर जणू जीवनाचाच एक वेगळा न करता येणारा भाग, त्यावर विचार करावा असं आता काहीच नाही..

बस येईल बहुधा आता, नाहीतर येणारही नाही, मग नाक्यापर्यंत पायी जाऊन रिक्षा किंवा टॅक्सी, पण पावसाने जरा तरी उघडावं.. आज स्वयंपाक नकोच जरा, नाहीतरी घरी कुणी नाही... काहीबाही खाऊन लवंडावं लवकर! दिवसभराची दमणूक झाल्याच्यानंतर....'

... हवेच्या जोरदार झोताबरोबर पावसाच्या तुषारांचा शिडकावा चेहऱ्यावर होताच विचारांची साखळी तुटली.. आता मिट्ट अंधारलं होतं!

तिला मगाचपासून उजवीकडे दूरवर एक प्रकाशझोत दिसत होता.. तो स्थिर असल्याने, एखादी कार तिथे उभी असावी हे तिनं ताडलं. तो झोत आता अगदी जवळ आला... 'ही एखादी टॅक्सी असेल तर किती बरं' अशा विचारानिशी ती अपे़क्षेने त्या गाडीकडे टक लावून होती.. ती गाडी स्टॉपजवळ येऊन थांबली.. पावसाच्या

रणधुमाळीत ती एखाद्याची कार आहे की टॅक्सी हे तिला समजेना.. पण ती गाडी थांबून पाच मिनिटे झाली तरी हालचाल काही दिसेना...

तशी ती अस्वस्थ झाली .. आपण आपले छत्री उघडून चालते व्हावे, नाक्यावर जावे उद्देशाने ती सावरली, पदर नीट लपेटून घेतला, खांद्याला अडकवलेली पर्स काखेत गच्च धरली, छत्री उघडणार इतक्यात, त्या गाडीतून मोठ्या काळ्या छत्रीतून एक सावली पुढे आली.. खूप पुढे... अगदी त्या स्टॉपच्या समोरून तिच्या दिशेने पुढे.... तिच्या जवळ... येत गेली...

आता तिच्या सर्व हालचाली थंडावल्या होत्या... त्या व्यक्तीला जवळून पाहताच, बुद्धीला ओळख पटली होती ... पण मनाला पटत नव्हतं... त्या व्यक्तीनं 'आपण ओळखीचेच आहोत' असे सुहास्य धारण केलं होतं, त्या हास्यामुळे ती अजून गडबडली होती, मन- बुद्धी- भावना कशाची कशाला सांगड नव्हती, खरे की खोटे ह्याचे भान येण्याआतच तिची शुद्ध हरपली...

"अल्पा, अल्पा....." अशा पुसट, अंधुक हाका ऐकत ती जाणिवे- नेणिवेच्या पलीकडे गेली.

---

**भाग - २**

चेहऱ्यावर हलक्या गरम हवेचा झोत त्यामुळे आलेली ऊब... पापण्या हळुवार उघडल्या गेल्या..

अगदी निश्चिंतपणे डोळ्यासमोरचा अंधार कमी कमी होत गेला... समोर आडव्या काचेला बांधलेलं छोटं खेळणं मंद लयीत डुलत होतं... कानावर खूप आवडीचं कुठलंतरी गाणं पडत होतं... कुठलातरी मंद गंध व्यापून उरला होता..

आपल्याला पूर्णपणे जाग येण्यापूर्वीचे काही क्षण... मेंदूने आपल्या शरीरावर संपूर्ण ताबा मिळवण्याआधीचे ते क्षण....निर्व्याज!

...त्या क्षणांत आपण जिवंत आहोत इतकंच जाणवतं. कर्तव्य, जबाबदाऱ्या, नाती- आपण कोण, कोणाचे कोण, आपलं कोण, चिंता, विवंचना कशा-कशाची म्हणून आठवण नसते.. किंबहुना स्थळाचं काळाचंही भान नसलेले ते शुद्ध क्षण....!

.. अंगावरच्या साडीची ओल जाणवताच परिस्थितीचं भान येत गेलं..

मघाचा सुनसान बसस्टॉप, बंद पडलेलं मनगटावरचं घड्याळ, पावसाचा धुमाकूळ, न मिळणारी बस, एक जवळ येणारा झोत..... एक सावली .. आणि अवि!... अवि?? अवि???

हो अविच!

झटकन सावरण्याच्या प्रयत्नात सीट्बेल्ट ने जखडल्याचं जाणवलं... गाडी अविच चालवत होता.... हे सारं विश्वास ठेवण्यापलीकडचं होतं..

पावसाच्या गारठ्यामुळे त्या बंद गाडीत हिटर लावलेला होता, गरम हवेच्या त्या झोतासोबत मोगऱ्याचा सुगंध दरवळत होता, रफीची गाणी सुरू होती अन शेजारी, माझ्या शेजारी तेच ओळखीचं हास्य होतं, आश्वासक...खरंच शेजारी अवि होता!! !

"अल्पा, अगदी बेशुद्ध होण्याइतका वाईट दिसतोय का मी आता?" आणि स्वतःशीच हसला तो... दिलखुलास..! हे ही ओळखीचंच होतं ना? मधली आठ वर्ष कुठे आहेत? इतका सहज कसा वागतोय हा?

"मी ह्या गाडीत कशी?"

प्रश्नाला उत्तर म्हणून, पुन्हा तेच हसणं...?

"मी, तुझ्या ह्या गाडीत कशी आले आहे, अविनाश?"

"बापरे, संपूर्ण नाव उच्चारलंस? अजूनही रागातच आहेस?"

काय चाललंय... मी दीर्घ श्वास घेतला.. हे सगळं आता एखाद्या स्वप्नात पाहिल्यासारखं वाटत होतं, तसंही अवि परतून आल्याची लाख स्वप्नं पाहून झाली होती, तुटण्यासाठीच! हे कदाचित त्यातलंच एक असावं... पण त्या स्वप्नांची दखल घेणंच बंद केलंय आपण आता, तेव्हा हा खरंच आला किंवा न आला तर मी शुद्ध हरवण्याइतकं चमत्कारिक का आहे?

"अल्पा, स्वप्नात नाहीस तू, चिमटा घेऊ का एक? बरं इकड्च्या बाजूने उजवीकडे, आत वळल्या नंतरचीच सोसायटी ना?"

ह्याला माझं घर माहिती आहे? माझा फ्लॅट? आम्ही सोसायटीजवळ आलोय म्हणजे मी किती वेळ शुद्धीवर नव्हते? अजून काय माहिती असणार ह्याला? माझ्यासोबत कोण आहेत, किंबहुना मी कुठे काम करते, माझा स्टॉपही माहितीच असावा, उगीच का तो तिथे आला होता? पण कसं?

मी सुन्न झाले... सुन्न सुन्न झाले... आधीच मला ह्याला समोर पाहून काही सुचलं नव्हतं, मुळात, हे स्वप्न की सत्य ह्यातच मी अडकले होते त्यात हे असे धक्क्यांवर धक्के!!

"तू उतरतेस?"

"अं...?"

"तुझा फ्लॅट ना हा वरती... दुसरा मजला.. ?"

"....."

"तू बोल तर काही, बरं, फ्लॅट दाखवतेस? कॉफी ऑफर करणार?"

"कॉफी?"

"येस, कॉफी? खरं तर तुझ्याशी खूप काही बोलायचंय.. साचलेलं... सांगायचंय, विचारायचंय, तसंही असं भिजलं की वाफाळलेली कॉफी आवडते ना, तुला?"

आता परिस्थितीशी पूर्णतः सांगड घातली होती मी.. कॉफी? संभाषण, संवाद... किंबहुना अविनाश - कितीसा अर्थ उरला आहे ह्या शब्दांना...

"नो मोअर, अविनाश... बाय"

माझ्यातला संताप, उद्वेग ह्या साऱ्यांची कटुता ह्या शब्दांत उतरल्याचं मलाच जाणवून गेलं.. गाडीच्या बंद होणाऱ्या दरवाजासह मी स्वतःला पुरतं सावरलं होतं... पावसाची तमा न बाळगता मी सोसायटीच्या गेटकडे निघाले..

"अगं पण.... ऐक तर....
अल्पा, अल्पा वेट......."

पाठ आणि मन, दोन्ही वळले की अशा हाका ऐकायला येतात कुठे?

------------------------------------------------------------------

(संपूर्ण कादंबरी लवकरच येत आहे...)

- बागेश्री देशमुख (Venusahitya@gmail.com)

# प्रभावी व्यक्तीमत्व

एखादी व्यक्ती तिचे दिसणे म्हणजे उंची .. शरीरयष्टी ..त्वचेचा रंग ..आपल्या दृष्टीकोनात असलेली सौंदर्याची परिभाषा यात तंतोतंत बसणारी असते , दिसताक्षणी ती व्यक्ती आपल्या मनावर स्वतःची छाप सोडते ..आपल्या स्मृतीत स्थान मिळवते हा अनुभव सर्वांनाच असतो . काही लोक यालाच व्यक्तिमत्व असे संबोधतात .खरे तर हे त्या व्यक्तीचे केवळ शारीरिक स्वरूप असते जे निसर्गाने प्रत्येकाला वेगवेगळ्या स्वरुपात प्रदान केलेले आहे. केवळ दिसायला सुंदर किवा देखणे असणे ही चांगल्या व्यक्तीमत्वाची व्याख्या नव्हे ..तर तुमचे चालणे .बोलणे ..चेहऱ्यावरील भाव ..आणि सर्वात मुख्य म्हणजे तुमचे विचार आणि जोडीने आचार ..या सगळ्या गोष्टीं विचारात घेवून आपल्या प्रभावी व्यक्तिमत्वाची व्याख्या करता येईल व ती परिपूर्ण असेल. आपण दिसायला कसे असू हे आपल्या हातात नसते ...निसर्गाने जे शरीर ..रंग ..रूप आपल्याला प्रदान केलेले आहे त्यात आपण फारसा बदल करू शकत नाही .. व्यायाम ..योगासने .. सौंदर्य प्रसाधने यांचा वापर करून त्यात आपण काही प्रमाणात बदल करू

शकू त्यामुळे आपले बाह्यदर्शन इतरांसाठी प्रभावी ठरेल ..परंतु जर आपले विचार ..भावना ..कृती यात जर सौंदर्य नसेल तर हा केवळ बाह्यदर्शनाचा प्रभाव फार काळ टिकून राहणार नाही हे देखील तितकेच खरे आहे. अंतर्गत सौंदर्य जोपासण्यासाठी आणि वाढविण्यासाठी काही गोष्टींकडे लक्ष देणे गरजेचे आहे. आपल्या स्वभावात वागण्या बोलण्यात बदल करण्यासाठी खालील गुण अंगी बाणविण्याचा प्रयत्न केला तर हे गुण आपल्या अंतर्गत सौंदर्याचे अलंकार ठरतील ..जे सोने ..हिरे ..माणके या पेक्षाही अधिक मौल्यवान आहेत .

१)श्रद्धा - विश्वाच्या या अफाट पसाऱ्याचे सुसूत्र संचालन करणारी कोणतीतरी शक्ती अस्तित्वात आहे हा विश्वास वाढवत नेणे म्हणजे श्रद्धा होय .. जरी वेगवेगळ्या धर्मानी ..पंथांनी ..विज्ञानाने या संचालकाला वेगवेगळ्या नावांनी संबोधले असले तरी ती शक्ती आहे तिचे काही नियम आहेत जे समजून घेवून आचरण केले तर नक्कीच जिवन अधिक आनंदाने व्यतीत करता येते .. सर्वात महत्वाचा नियम असा आहे की न्युटन या शास्त्रज्ञाच्या क्रिया - प्रतिक्रिया या सिद्धांतानुसार आपण करत असलेल्या प्रत्येक कृतीचे फळ आपल्याला प्रतिक्रियेच्या स्वरुपात प्राप्त होते .. जर क्रिया इतरांना आनंद

देणारी असेल तर आपल्यालाही आनंद मिळेल व आपली क्रिया इतरांवर अन्याय करणारी ..इतरांना दुखः देणारी असेल तर आपल्याला ही नक्कीच कधी ना कधी दुखी: व्हावे लागते .आणि या नियमाला कोणीही अपवाद नाही . कर्माचे फळ हे मिळतेच फक्त ते कधी ..कोणत्या मार्गाने ..कोणत्या स्वरुपात मिळेल हे आपल्या हाती नाही. त्यामुळे आपल्या प्रत्येक कर्माबाबत नेहमी सावध असले पाहिजे डोळसपणे श्रद्धा आणि अंधश्रद्धा यातील फरक लक्षात घेवून केवळ श्रद्धेच्या मार्गावर वाटचाल केली पाहिजे ..'असेल हरी तर देईल खटल्या वरी ' अशी अंधश्रद्धा नको .

२ ) नम्रता - अगणित सूर्यमाला ..असंख्य सूर्य .. ग्रह ..तारे असा विश्वाचा पसारा आहे .. या सगळ्या पसाऱ्यात कोट्यावधी जीव वेगवेगळ्या प्रकारांनी अस्तित्वात आहेत .. या सर्व पसाऱ्याचा आपण एक शुल्लक भाग आहोत हे मान्य करायलाच हवे ..प्रत्येक जीवाची वेगवेगळी वैशिष्ट्ये आहेत ... तशीच निसर्गाने मानवाला देखील काही वैशिष्ट्ये बहाल केली आहेत .. त्यामुळे अंगभूत सौंदर्य .. पैसा ..जमीन जुमला ..सत्ता या सगळ्या गोष्टी आपणास कधीतरी सोडून जाणार आहेत ही जाणीव माणसाला नम्र राहण्यास मदत करू शकते ..शक्तीचा ..बुद्धीचा .. सौंदर्याचा .. रंगरूपाचा .शिक्षणाचा

..जाती धर्माचा अहंकार जर व्यक्तिमत्वाला चिकटला तर नक्कीच हा अहंकार आपल्याला नकळत इतर व्यक्तींपासून तोडण्याचे काम करत जातो .. हे सतत लक्षात ठेवून जर मनात नम्रतेचा भाव जागृत ठेवला तर आपल्या अंतर्गत सौंदर्यात एका मौल्यवान अलंकाराची भर पडेल .

३ ) मृदू वाणी - तलवार ..एखादे संहारक शस्त्र ..जितका विध्वंस करू शकत नाही तितका विश्वंस करण्याचे सामर्थ्य वाणी म्हणजे माणसाच्या बोलण्यात असते ..बहुधा हे लक्षात न घेता वाणीचा वापर केला जातो ..आपल्याला जसे मन आहे भावना आहे ..त्या दुखावल्या जातात तसेच इतरांच्या बाबतीतही घडते हे समजून न घेता जेव्हा आपण बोलतो तेव्हा आपण इतरांना दुखावत असतो ..एखाद्या व्यक्तीने कितीही मोठी चूक केली.. आपल्याला कितीही राग आला तरी तो व्यक्त करण्यासाठी आरडा ओरडा करणे.. इतरांचा अपमान होईल.. ते दुखावले जातील असे बोलणे म्हणजे आसपासच्या लोकांच्या मनावर धारधार तलवार चालाविण्यासारखे असते ..किती आणि कशा जखमा होतील याचाही अंदाज येत नाही .. आणि शरीरावर झालेले घाव भरून निघतात मात्र मनावरील घाव सहजा सहजी भरून निघत नाहीत हे तर सर्वश्रुत आहे .बोलताना

नेहमी शांत स्वरात ..संयमी शब्दात ..बोलले गेले तर ही मृदू वाणी खूप मोठे काम करते ..खोटे खोटे गोड न बोलता ..परिस्थिती समजून घेवून .. जर संतुलित बोलले गेले तर अधिक चांगले .

४ ) क्षमा भाव -- चुका करणार नाही असा माणूस विरळाच ..प्रत्येकाच्या स्वभावात काहीतरी कमी जास्त असते ..त्यानुसार व्यक्ती वर्तन करतात ..अनेकदा इतरांनी केलेल्या चुकांमुळे आपल्याला काहीतरी आर्थिक ..मानसिक ..कौटुंबिक अथवा सामाजिक नुकसान देखील पोहोचू शकते ..त्या मुळे राग अनावर होऊन अशा चूक करणाऱ्या व्यक्तीला शिक्षा करण्याचा ..त्याचे काहीतरी नुकसान करण्याचा मोह होणे स्वाभाविक आहे .. किंवा जेथे आपण अशी शिक्षा करू शकत नाही तेथे मनात वैरभाव जपला जातो .. खुन्नस पाळली जाते ..सूडभावना बळावते .. ही ठिणगी खूप मोठ्या वणव्यात रुपांतरीत व्हायला वेळ लागत नाही हे ध्यानात घेतले तर ..स्वतची मनशांती जपणे सोपे जाईल .. आपणही आयुष्यात काही चुका केल्या आहेत याचे भान ठेवून ..जगात कोणीच परिपूर्ण नाही हे समजून घेवून इतरांना क्षमा करत राहणे नेहमीच

फायदेशीर ठरते . पुन्हा ती चूक न होण्यसाठी त्या व्यक्तीला मृदू शब्दात समज देवून देखील आपले काम होते .

५ )मदत -- जगात आपल्या पेक्षा जास्त दुखी: जीव आहेत ..अनेक प्रकारच्या विवंचनांनी ग्रस्त आहेत हे आपण सदैव लक्षात ठेवले पाहिजे ..व अशा दुखी: जीवना जमेल तेव्हढी मदत करणे हे उत्तम माणसाचे लक्षण आहे .. प्रत्येक वेळी आर्थिक मदत करणे सर्वानाच जमत नाही मात्र आपण वैचारिक मदत नक्कीच करू शकतो .. इतरांना ते संकटात असताना जमेल मदत करत गेले तर आपली दुखे: दूर होत राहतात हा अध्यात्मिक नियम आहे .

६) समाधान -समाधान हा एक अतिशय दुर्मिळ गुण आहे .. याचे कारण प्रत्येकाला अधिक अधिक आनंद ..सुख जीवनात नेहमी मिळत राहावे असे वाटते ..मात्र सर्वांनाच सर्व सुखे सतत मिळू शकत नाहीत हा एक नियम आहे निसर्गाचा .. आपल्याला जे मिळाले आहे ..जे मिळते आहे ..प्रामाणिकपणे कष्ट करून ..लबाडी न करता ..कोणावरही अन्याय न करता जे मिळवता येईल त्यात समाधानी राहणे ही फार मोठी कला आहे ..आपल्याला जे मिळते आहे ..मिळाले आहे त्या कडे दुर्लक्ष करून जे

मिळायला हवे होते ..जे मिळू शकले नाही .. जे मिळणार नाही अश्या गोष्टींकडे नेहमी माणसाचे मन धाव घेते ..त्यामुळे सततची अवस्थता ..बैचेनी ..आपले समाधान हिरावून घेते .

७) धैर्य -- जिवन म्हणजे सुख --दुखः , आशा -निराशा , ऊन - पाऊस , असा खेळ आहे ...प्रत्येकाच्या आयुष्यात वेगवेगळ्या कारणांनी अनेक समस्या निर्माण होत असतात अशा वेळी या समस्या ..संकटे आपणास त्रास देण्यासाठी निर्माण झाल्या नसून . आपली एक परीक्षा आहे असे समजले तर अधिक बरे असते ..मग या परीक्षेत पास होण्यासाठी आपली सगळी शक्ती पणाला लावता येते .. अपयश आले तरी पुन्हा प्रयत्न करता येतात ..परमेश्वरावर श्रद्धा ठेवून सतत प्रयत्न करत राहावे लागतात ..अनेकदा समस्या सुटल्या नाहीत तरी त्या आपल्याला जिवनविषयक मोठी शिकवण देवून जातात असा माझा अनुभव आहे .

वरील गोष्टींखेरीज इतरही अनेक गोष्टी आहेत ज्यात समाधान ..शांती ..सेवा ..खंबीरपणा .. अशा गुणांचा समावेश करता येईल .. आपल्या विचारात हे सगळे ठाम पणे वसले तर आचरणात आणायला देखील वेळ लागत नाही .आपले व्यक्तिमत्व जर

दीर्घकालीन प्रभाव पडणारे असावे असे वाटत असेल तर नक्कीच सर्वांनी याचा विचार करणे गरजेचे आहे .शेवटी केवळ हेच शिल्लक राहते बाकी सगळे सोडून जाते .

- तुषार नातू (tusharnatublog@gmail.com)
http://tusharnatu2013.blogspot.in/

# हा अंक अपूर्ण आहे

हा अंक कसा वाटला तुम्हाला? आम्हाला तरी हा अंक अपूर्ण वाटतो आहे. यात महाराष्ट्राच्या जिल्ह्याजिह्यातून, तालुक्या तालुक्यातून रहाणाऱ्या , आणि आपल्या मनातले विचार, कथा, स्मृतीबंध, लिहीणाऱ्या हजार हातांची गरज आहे. जागोजाग चालणाऱ्या कार्यांची माहिती असायला हवी. आणि महाराष्ट्रातच नव्हे तर जगातल्या प्रत्येक देशात पसरलेल्या पण मनाने महाराष्ट्राच्या मातीत रमणाऱ्यांचं लिखाण यायला हवंय. हा अंक जसा महाराष्ट्राच्या कोन्याकोपऱ्यात आणि जगाच्या देशोदेशी जातो तसं जगभरातलं, गांवोगांवचं लिखाणही यात यायला हवं. बोली भाषांचा सुगंध यायला हवा. तुमचं लिखाण हवं आहे. कृपया आपलं लिखाण etyarth. esahity@gmail. Com वर पाठवा.

याबरोबरच अंकाच्या वाचकांची व्याप्ती वाढायला हवी. तुम्ही आणि तुमच्या सारख्या प्रत्येक वाचकांनी जर आठ मेल आयडी दिल्या तर आपण एक टक्का मराठी माणसांपर्यंत

पोहोचू. जास्त दिल्यात तरी हरकत नाही. पण किमान आठ मेल आयडी. आपले मित्र. नातेवाईक. ज्यांना मराठी वाचता येतं अशा फ़क्त आठ लोकांच्या आय डी esahity@gmail.com या आयडी वर पाठवा.

मित्रांनो. आम्ही काही जगावेगळे लोक नाही. तुमच्यातलेच , तुमच्यासारखेच. काही विद्यार्थी, काही नोकरदार, काही व्यावसायिक. आपल्या फ़ावल्या वेळेत हे काम करत असतो. तुम्हाला ही असं काही करावंसं वाटतंय. तर मग या ना. आपण एकत्र काम करूया. तुमच्याकडे काही कल्पना असतील. नव्या. ताज्या. फ़्रेश.. ..

काही जगावेगळं करूया... अपूर्णतेचा अंत करूया !